**वाईन उद्योगास प्रोत्साहन अनुदान देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वाप्रोअ-१७१४/प्र.क्र.३७/उद्योग-२,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २८ ऑक्टोबर, २०१४.

वाचा -

१) **शासन निर्णय क्र. क्र. डब्ल्युआयपी-२००९/प्र.क्र.३२८/उद्योग-२, दि. ३१/०८/२००९.**
२) **शासन शुध्दीपत्रक क्र. डब्ल्युआयपी-२००९/प्र.क्र.३२८/उद्योग-२, दि. २१/०८/२०१०.**

**शासन पूरकपत्र -**

उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक डब्ल्युआयपी-२००९/प्र.क्र.३२८/उद्योग-२, दिनांक ३१/०८/२००९ व शासन शुध्दीपत्रक क्र. डब्ल्युआयपी-२००९/प्र.क्र.३२८/उद्योग-२, दिनांक २१/०८/२०१० अन्वये वाईन उद्योगास प्रेत्साहन अनुदान देण्याबाबतचा निर्णय घेतला आहे.

२. तद्नंतर महाराष्ट्र मूल्यवर्धित कर अधिनियमाच्या अनुसूची “घ” मध्ये नोंद ३ क मध्ये “वाईन विक्री व बल्क वाईन विक्री” अशी होती. बल्क वाईनला एम.आर.पी. नसते म्हणून बल्क वाईनची वेगळी नोंद करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार, सदर संबंधित तरतुदीमध्ये सुधारणा करुन नोंद ३ क मध्ये “वाईन विक्री” व ३ ख मध्ये “बल्क वाईन विक्री” या स्वतंत्र बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

वरील वस्तुस्थिती विचारात घेऊन, वाईन विक्री किंमतीवर आधारीत प्रोत्साहन द्यावे, की वाईनच्या कमाल किरकोळ किंमतीवर आधारीत प्रोत्साहन द्यावे या विषयावरील प्रस्ताव शासनास सादर केला असता, शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

“ वाईन उत्पादकांनी भरणा केलेल्या २० टक्के करापैकी १६ टक्के कराच्या रकमेइतके वाईन प्रोत्साहन अनुदान देण्यात यावे”.

३. सदर शासन पूरकपत्र वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ACS Finance No. E १०, दिनांक २०/०८/२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४ हे शासन पूरकपत्र निर्गमित केल्याच्या दिनांकापासून उपरोक्त मुद्यांच्या संदर्भात असलेली विविध स्तरावरील प्रलंबित प्रकरणे, प्रस्तुत पूरकपत्रकातील तरतुदी विचारात घेऊन निकालात काढावीत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२८१११९४५४७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Venkatesh Hanamantrao Kulkarni

Digitally signed by Venkatesh Hanamantrao Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Venkatesh Hanamantrao Kulkarni
Date: 2014.12.20 16:31:24 +05'30'

**( व्यं. ह. कुलकर्णी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. अपर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, गृह विभाग (उत्पादन शुल्क), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
६. आयुक्त राज्य उत्पादन शुल्क, मुंबई.
७. विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, मुंबई.
८. मंत्रालयीन विभाग (सर्व)
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०. जिल्हाधिकारी (सर्व)

प्रत -

१. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मंत्री (सर्व).
३. मा. राज्यमंत्री (सर्व).
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (उद्योग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव (उद्योग-२) यांचे स्वीय सहाय्यक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (उद्योग-२).